**सार्वजनिक बांधकाम विभागात दि.०२.०४.१९८१ ते दि.१६.०६.१९९७ या कालावधीत तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त झालेल्या पदवीधर कनिष्ठ अभियंता व सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) यांच्या सेवा विनियमित करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या अर्हता परीक्षेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक :-नियुक्ती /२०१४-प्र.क्र.४०/सेवा-३,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०१५.

**संदर्भ** :-१. शासन अधिसूचना, पाटबंधारे विभाग, क्र.एमएसी-१०८४/(६१)/आ(सं.नि.) दिनांक १६ जून, १९९७.
२.शासन अधिसूचना, जलसंपदा विभाग, क्र.एसएससी-१००८/(७३/२००८)/आ(सं.नि.) दिनांक ८ जूलै, २००९
३.महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१०६८/१०५२३/४०६८/दोन, दि.३० सप्टेंबर २०१५

## परिपत्रक

महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-ब मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदाच्या सेवा प्रवेश नियमामध्ये उपरोक्त दिनांक ८ जुलै, २००९ च्या शासन अधिसूचनेअन्वये सुधारणा करण्यात आलेली असून अधिनियमात सुधारणा केल्यानुसार पदवीधर कनिष्ठ अभियंता व सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावर दि.१६ जून, १९९७ पर्यंत करण्यात आलेल्या तात्पुरत्या नियुक्त्या विनियमित करण्यासंदर्भात तरतूद करण्यात आली आहे. त्या तरतुदीनुसार संबंधित अभियंत्यांच्या तोंडी अर्हता परीक्षा घेण्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगास विनंती करण्यात आली होती. त्याअनुषंगाने संबंधित अभियंत्यांच्यी सेवा विनियमित करण्यासाठी शासनाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार प्रथम संधी म्हणून आयोगामार्फत माहे सप्टेंबर / ऑक्टोबर-२०१० मध्ये मौखिक परीक्षा घेण्यात आली. तसेच दुसरी संधी म्हणून आयोगामार्फत माहे जुलै, २०१२ मध्ये मौखिक परीक्षा घेण्यात आली. सदर दोन्ही मौखिक परीक्षांचा निकाल आयोगाने जाहीर केला असून त्यामध्ये अनुत्तीर्ण झालेले अभियंते, सदर परिक्षेला अनुपस्थित राहीलेले अभियंते आणि उपरोक्त दोन्ही मौखिक परीक्षांचे आवेदनपत्र सादर न केलेले अभियंते अशा अभियंत्यांच्या सेवा नियमित करण्यासाठी त्यांना तिसरी व अंतिम संधी देण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहमतीने सन-२०१५ च्या मौखिक अर्हता परीक्षेचा कार्यक्रम जाहीर करण्यात येत आहे.

२. या संदर्भात संबंधित अभियंत्यांच्या मार्गदर्शनासाठी व कार्यवाहीसाठी पुढील सूचना देण्यात येत आहेत.

**२.१** सदर अर्हता परीक्षेसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे **ऑनलाईन** अर्ज करणे आवश्यक आहे.

**२.२** सर्व उमेदवारांनी स्वत:ची शैक्षणिक पात्रता, वय, जात/ जमात व निवास इत्यादी बाबतच्या नोंदी मूळ कागदपत्रांबरोबर पडताळूनच आयोगास सादर कराव्यात.

**३.** प्रस्तुत परिपत्रकामध्ये अर्हता परीक्षेसंबधी संक्षिप्त तपशिल दिलेला आहे. अर्ज करण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, शुल्क, इत्यादींबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवरील "**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**" या लिंकमध्ये उपलब्ध करून देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती अधिकृत समजण्यात येईल. प्रस्तुत परिपत्रक आयोगाच्या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**४. अर्ज करण्याची पद्धत :-**

**४.१** प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्विकारण्यात येतील. इतर कोणत्याही प्रकारे अर्ज स्विकारण्यात येणार नाहीत.

**४.२** पात्र उमेदवारांना वेब-बेस्ड (Web-based) ऑनलाईन अर्ज www.mahampsc.mahaonline.gov.in या वेबसाईटद्वारे **दि.२३/१०/२०१५ ते दि.१२/११/२०१५** या कालावधीत सादर करणे आवश्यक राहील.

**४.३** ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या www.mahampsc.mahaonline.gov.in तसेच, www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

**४.४** विहित पद्धतीने अर्ज सादर केल्यानंतर परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

**४.५** आयोगाने निश्चित केलेले परीक्षा शुल्क खालील पध्दतीने भरता येईल:-

१) भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे २) नेट बँकिंग ३) डेबिट कार्ड ४) क्रेडीट कार्ड ५) संग्राम केंद्र/सीएससी (नागरी सेवा केंद्र)

**४.६** www.mahaonline.gov.in येथे संग्राम केंद्र (ग्रामपंचायतीमध्ये) आणि सीएससीची सुची उपलब्ध आहे.

**४.७** परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खालील नमूद केलेल्या पध्दतीचा अवलंब करावा.

१) शुल्क भरण्याकरिता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागातील " माझे खाते" या लिंकवर क्लिक करावे.

२) " माझे खाते" या लिंकवर क्लिक केल्यानंतर उमेदवाराने अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरण्याच्या / न भरण्याच्या नोंदीसह असेल. ज्या पदासमोर "Unpaid" असे लिहिले असेल त्या ठिकाणी "Pay now" अशी लिंक उपलब्ध असेल.

३) **"Pay Now"** या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील. १) ऑनलाईन पेमेंट २) नागरी सुविधा केंद्र ३) चलनाव्दारे.

(४) उमेदवार क्रेडीट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेट बँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन पेमेंट करू शकतील.

(५) नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणाऱ्या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र किंवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. उपरोक्त कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहिल.

(६) उमेदवाराने "चलनाव्दारे" हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणाऱ्या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

(७) ज्या उमेदवारांना भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे शुल्क भरावयाचे आहे, असे उमेदवार अर्ज सादर केल्याच्या २ तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर करणाऱ्या उमेदवारांनी त्या पुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

४.८ ऑनलाईन पध्दतीने अर्ज केल्यानंतर अर्जाची प्रत व सोबतच्या **परिशिष्ट - अ** ची छायांकित प्रत **दि.२६/११/२०१५** पर्यंत शासनाच्या संबंधित विभागामार्फत आयोगास सादर करणे आवश्यक राहिल. त्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

४.९ ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर केल्यानंतर संबंधित उमेदवारांनी अर्जाची प्रत, त्यांच्या मूळ नियुक्ती व सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावरील नियुक्तीच्या प्रती, सेवापुस्तकातील पहिल्या पानाची व नियुक्तीच्या नोंदीची प्रत, मागासवर्गीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत जात वैधता प्रमाणपत्राची प्रत, शैक्षणिक अर्हतेचे प्रमाणपत्र, नियुक्ती आदेशाच्या प्रतीसह, शासनाकडे विभागप्रमुखांच्या मार्फत तात्काळ सादर करावी. **दि.२६/११/२०१५** नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

**मुलाखतीच्या वेळी उमेदवाराने मूळ प्रमाणपत्रांसह सोबतच्या परिशिष्ट अ प्रमाणे विहित नमुन्यात विभागप्रमुखांनी दिलेले प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय मुलाखतीस प्रवेश दिला जाणार नाही.**

४.१० विहित पध्दतीने अर्ज सादर करुन परीक्षा शुल्क भरण्याची तसेच स्टेट बँकेमध्ये परीक्षा शुल्क भरण्याकरीता चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दि.१२/११/२०१५** रोजी **२३.५९** वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

४.११ चलानद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये **दि. १६/११/२०१५** पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परिक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही. तसेच परीक्षा शुल्काचा परतावा ही केला जाणार नाही. विहीत दिनांकापर्यंत परीक्षा शुल्क भरण्याची कार्यवाही पूर्ण न केल्यास मौखिक अर्हता परिक्षेस प्रवेश मिळू शकणार नाही.

५. **शुल्क** :-

(१) अमागासवर्ग-रू.५२०/- (२) मागासवर्ग-रू. ३२०/-

६. प्रस्तुत सहायक अभियंता, श्रेणी-२ गट-ब पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदींनुसार नियुक्तीसाठी पात्र असलेले अभियंते सदर मुलाखतीस पात्र असतील. नेमणूकीस पात्र असलेल्या अभियंत्यांनी मुलाखतीस स्वखर्चाने उपस्थित राहणे आवश्यक आहे. मुलाखतीस उपस्थित न राहणा-या अभियंत्यांच्या तात्पुरत्या स्वरुपातील नेमणूकांना आयोगाची मान्यता मिळणार नाही. तसेच शासन आधिसूचना क्रमांक एमएससी-१००८/(७३/२००८)/आ(सं.नि.) दिनांक ०८ जुलै, २००९ अन्वये सदर मौखिक परीक्षा ही उमेदवारांची **तिसरी व अंतिम संधी** आहे याची नोंद घ्यावी.

७. सदर पदावरील नियुक्त्या समावेशनाने नियमित करण्याची बाब प्रस्तुत प्रकरणी न्यायप्रविष्ट प्रकरणांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

८. प्रस्तुत पदाच्या मुलाखती मुंबई येथे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-४०० ०२१ येथील कार्यालयात घेण्यात येतील. मौखिक अर्हता परिक्षेचा दिनांक व वेळ संबंधितांना आयोगाकडून उमेदवारांच्या प्रोफाईलद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच, याबाबतची माहिती संबंधित उमेदवारांना **ईमेल द्वारे** व **मोबाईलवर एसएमएस द्वारे** कळविण्यात येईल.

९. अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे उमेदवार परिपत्रकातील विहित अर्हतेबाबतच्या अटींची पूर्तता करतात असे समजून पात्रता न तपासता आयोगाकडून त्यांना मौखिक अर्हता परिक्षेस तात्पुरता प्रवेश दिला जाईल. परंतु सदर परिक्षेपूर्वी अथवा परिक्षेनंतर कोणत्याही टप्प्यावर, उमेदवाराने अर्जात नमूद केलेली माहिती चुकीची वा खोटी असल्याचे अथवा उमेदवार विहित अर्हतेची पूर्तता करीत नसल्याचे आयोगास आढळल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल आणि त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

**१०.** शासन अधिसूचना, जलसंपदा विभाग, क्रमांक एमएससी-१००८/(७३/२००८)/आ(सं.नि.) दिनांक ०८ जुलै, २००९ मधील नियम ३ (जे) मधील तरतुदीनुसार, संबंधित अभियंत्यांची आपापसातील जेष्ठता ठरविण्यात येईल.

**११.** आयोगाचे अध्यक्ष, सदस्य किंवा अधिकारी यांच्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दडपण आणण्याचा कोणताही प्रयत्न केल्यास अशा उमेदवारास आयोगाच्या निवडीपासून अपात्र ठरविण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१५१०२११७१६३७६९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

Vaishali Manish Sule

Digitally signed by Vaishali Manish Sule
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vaishali Manish Sule
Date: 2015.10.23 10:54:06 +05'30'

**(वैशाली सुळे)**

शासनाच्या अवर सचिव

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (*पत्राद्वारे)
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती /नागपूर
३. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकणभवन, नवी मुंबई
४. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर.
६. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ/दक्षता व गुणनियंत्रण मंडळ/राष्ट्रीय महामार्ग/विशेष प्रकल्प.
७. निवड नस्ती/सेवा-३.

**(शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. नियुक्ती -२०१४/प्र.क्र.४०/सेवा-३, दि.२१/१०/२०१५ चे सहपत्र )**

**परिशिष्ट - -अ॰**

**उमेदवाराच्या पात्रतेसंबंधी विभागप्रमुखांनी द्यावयाचे प्रमाणपत्र**

**प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, श्री /श्रीमती ....................................... यांची सार्वजनिक बांधकाम विभागात मूळ नियुक्ती * **कनिष्ठ अभियंता** या पदावर दिनांक ................ रोजी झाली असून शासन आदेश / निर्णय क्रमांक ..............................................., दिनांक ..................अन्वये, त्यांना ३/८ सेवेचा लाभ देऊन सहाय्यक अभियंता श्रेणी -२ (स्थापत्य) या पदाचा मानीव दिनांक ....................... असा देण्यात आला आहे. / * सार्वजनिक बांधकाम विभागात **सहायक अभियंता श्रेणी -२ (स्थापत्य)** या पदावर तदर्थ नियुक्ती आदेश क्रमांक ....................... दिनांक ....................... असा असून ते दिनांक .................... रोजी सेवेत रुजू झाले आहेत. (सोबत नियुक्ती आदेशाची प्रत जोडली आहे.)

२. शासन अधिसूचना क्रमांक एमएससी - १००८/(७३/२००८) आ (सं.नि.), दिनांक ८.७.२००९ अन्वये या कार्यालयाच्या उपलब्ध सेवा तपशीलानुसार सहाय्यक अभियंता श्रेणी -२ (स्थापत्य) पदाच्या सुधारीत सेवा प्रवेश नियमानुसार श्री / श्रीमती ............................... महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मौखिक परिक्षेच्या **तिस-या व अंतिम संधीसाठी** पात्र आहेत. (मौखिक परीक्षा-२०१० व २०१२ मध्ये त्यांचा मुलाखत क्रमांक अनुक्रमे ........ असा होता.त्यावेळी त्यांनी अर्हता प्राप्त केलेली नाही. )

३. शासकीय अभिलेख्यानुसार त्यांची जन्मतारीख ...................... आहे. आयोगाच्या जाहीरातीतील तरतूदीनुसार ते सन २०१३ -१४ ला वयाधिक होत असले तरी या पदाच्या सेवा प्रवेश नियमावलीतील नियम ८ मधील तरतूदीनुसार कमाल वयोमर्यादेची अट शिथिल करुन ते सदर मौखिक परीक्षेस पात्र आहेत.

४. वरील माहिती सदर अभियंत्याच्या सेवा पुस्तकाच्या नोंदी व उपलब्ध अभिलेखावरुन तपासली असून ही माहिती बिनचूक आहे. तसेच त्यांचे गोपनीय अहवाल चांगले आहेत.

* लागू नसेल ते खोडावे.

दिनांक :- स्वाक्षरी

ठिकाण :-

विभागप्रमुख

सही, नांव व पदनाम